**महाराष्ट्र खनिज विकास निधी अंतर्गत**
**परभणी जिल्ह्यातील कामांना प्रशासकीय**
**मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमडीएफ-०११५/ प्र.क्र.०१ / उद्योग-९**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: १०.०२.२०१५

**प्रस्तावना -**

राज्य खनिज धोरण १९९९ मधील धोरणाशी सुसंगत राहून महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजना) निधी अधिनियम २००१ अन्वये महाराष्ट्र खनिज विकास निधीची निर्मिती करण्यात आली आहे.या निधीतून हाती घ्यावयाच्या व शासन निर्णय क्र. एमडीएफ- १०१० / प्र.क्र.१०३७ / उद्योग-९, दि.०१.०८.२०१२ मधील मार्गदर्शक तत्वानुसार पात्र ठरणाऱ्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ नागपूर यांनी प्रस्तावित केलेल्या परभणी जिल्ह्यातील रस्ते विकासाच्या खाली नमूद केलेल्या रु. १६१.७४ लक्ष (रु.एक कोटी एकसष्ठ लक्ष चौ-याहत्तर हजार फक्त) अंदाजित खर्चाच्या ०३ कामांना या आदेशाद्वारे प्रशासकीय व वित्तिय मान्यता देण्यात येत आहे .

(रुपये लाखात)

| अक्र. | तालुका | कामाचे विवरण | कामांची किंमत |
|---|---|---|---|
| | | **कार्यान्वयन यंत्रणा - सार्वजनिक बांधकाम विभाग , परभणी** | |
| १. | गंगाखेड | मोराळ सावंगी गोंडगाव रस्त्याची सुधारणा करणे प्रजिमा २१ कि.मी. २/७०० ते ४/१०० | ४९.५३ |
| २. | पूर्णा | हिंगोली औंढा हट्टा पूर्णा धनकर टाकळी रस्त्याची सुधारणा करणे रा.मा. २४९ कि.मी. ७३/५०० ते ७४/८०० | ५०.६७ |
| ३. | पाथरी | बाणेगांव मरडस गांव गोपेगांव रस्त्याची सुधारणा करणे प्रजिमा २६ कि.मी. ५/०० ते ८/०० | ६१.५४ |
| | | **एकूण ०३ कामे** | **१६१.७४** |

या प्रयोजनावरील खर्च मागणी क्र.के-७ मुख्यलेखाशीर्ष "२८५३, अलोह खनिकर्म व धातुविषयक उद्योग-०२ खाणींचे विनियमन व विकास- १०२ खनिज समन्वेषण-(००) (०५)" खनिज

विकास ( योजनेतर ) ( २८५३ ०१३ २ ) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व या शीर्षाखाली महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ नागपूर यांना सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून भागाविण्यात यावा.

३. महाराष्ट्र खनिज विकास निधीतून मंजूर करण्यात आलेली कामे कार्यान्वयन यंत्रणांनी विना आकारणी तत्वावर करावयाची आहेत.

४. या कामांना निधी वितरणास मान्यता मिळाल्याशिवाय या प्रयोजनावर खर्च करता येणार नाही. उपरोक्त मंजूर करण्यात आलेल्या प्रस्तावांची कामे करण्यासाठी, निधी वितरीत करण्यापूर्वी महाराष्ट्र खनिज विकास (निर्मिती व उपयोजन) निधी अधिनियम २००१ व नियम २००१ मधील तरतुदी / शासनाने जी मार्गदर्शक तत्वे ठरविलेली आहेत ती आणि जे आदेश दिले आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करण्यात आले आहे याची खातरजमा महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर यांनी करावी.

५. सदर प्रशासकीय मान्यता महाराष्ट्र खनिज विकास ( निर्मिती व उपयोजन ) निधी अधिनियम २००१ च्या कलम ७ ( १ ) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तिनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१०१५२७४३५६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jotiba Shivappa Bagadi

Digitally signed by Jotiba Shivappa Bagadi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jotiba Shivappa Bagadi
Date: 2015.02.18 15:13:28 +05'30'

**( जो. शि. बागडी )**

कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या., नागपूर.
२. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी.
३. मा. मंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. निवडनस्ती (उद्योग-९)